**मुंबई मध्यवर्ती कारागृहातील सर्कल क्र.१ (तळमजला + पहिला मजला) चे बांधकाम व विद्युतीकरणाचे काम पूर्ण करण्याकरिताच्या अंदाजपत्रकास सुधारित प्रशासकीय मान्यता देणेबाबत...**

# महाराष्ट्र शासन

**गृह विभाग**

**शासन निर्णय क्र. जेएलएम-१११७/प्र.क्र.१५६/तुरुंग-२,**

दुसरा मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा रोड, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २७ जानेवारी, २०२०.

<u>वाचा</u>: १. शासन निर्णय क्र.जेएलएम-१३०७/प्र.क्र.७७/पीआरएस-२, दिनांक ६.७.२००७.

२.शासन निर्णय क्र.जेएलएम१३०६/प्र.क्र.१३१/पीआरएस-२,दिनांक २१.१.२००९.

३. शासन निर्णय क्र. जेएलएम १३०९/प्र.क्र.१६८/पीआरएस-२, दिनांक ३.८.२००९.

४. अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य यांचे पत्र क्र.बीएलडी/मुंबई म.का./स.क्र.१ त. मजला/निधी/१०१५७/कक्ष- ६ ३ पुणे-१, दिनांक १६.११.२०१७.

५. वित्त विभाग, शासन पत्र क्र.व्यअस २०१९/प्र.क्र.३७/अर्थ-२, दिनांक ३०.८.२०१९ चे सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या संदर्भात दिनांक २०.८.२०१९ रोजी झालेल्या व्यय अग्रक्रम समितीच्या बैठकीचे इतिवृत्त.

**<u>प्रस्तावना:</u>**

केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेंतर्गत मुंबई मध्यवर्ती कारागृहातील सर्कल क्र.१ (तळमजला + पहिला मजला) चे बांधकाम व विद्युतीकरणाचे कामाकरिता रु.२६२.७१ लक्ष इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता संदर्भीय क्र.१ येथील शासन निर्णय दिनांक ६.७.२००७ अन्वये देण्यात आली होती. केंद्र पुरस्कृत कारागृह सुधारणा योजनेंतर्गत सदर कामासाठी रु.२६० लक्ष इतका निधी उपलब्ध करुन देण्यात आला व सदर निधी पूर्णत: खर्च झालेला आहे. सदर प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देतेवेळी अंदाजपत्रक हे २००६-२००७ च्या दरसूचीवर आधारित होते. सद्य:स्थितीत या इमारतीमध्ये तळ मजल्याचे आर.सी.सी.चे काम पूर्ण करण्यात आले आहे. सदर कामासाठी टप्प्याटप्प्याने निधी उपलब्ध करुन देण्यात आलेला होता. तथापि, मुंबई दहशतवादी हल्यातील दहशतवाद्यांसाठी अतिसुरक्षा कक्ष बांधण्यासाठी या प्रकल्पातील काही निधी वर्ग करण्यात आला. त्यामुळे, मुंबई मध्यवर्ती कारागृहातील सर्कल क्र.१ (तळमजला + पहिला मजला) चे बांधकाम व विद्युतीकरण, या कामाच्या अंदाजपत्रकामध्ये भाववाढ होऊन कामाची किंमत वाढलेली आहे.

२. त्यानुसार संदर्भीय क्र.४ येथील पत्रान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत कार्यकारी अभियंता, मध्य मुंबई, सार्वजनिक बांधकाम विभाग,वरळी, मुंबई यांनी रु.४४९.४१ लक्ष इतक्या खर्चाचे सुधारित अंदाजपत्रके अपर पोलीस महासंचालक व कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी शासनास मान्यतेसाठी सादर केली आहेत.

३. मुंबई मध्यवर्ती कारागृहातील सर्कल क्र.१ (तळमजला + पहिला मजला) चे बांधकाम व विद्युतीकरणाचे कामाकरीता रु.४४९.४० लक्ष (अक्षरी चार कोटी एकोणपन्नास लाख ऐकेचाळीस हजार फक्त) इतक्या खर्चाच्या सुधारित अंदाजपत्रकास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे. तसेच शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दि.१७.४.२०१५ व वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ मधील भाग-पहिला, उप विभाग-पाच, अनुक्रमांक-९ नियम १३४ नुसार इमारती व कामाच्या बाबतीत नकाशे व अंदाजित खर्च यांना सुधारित प्रशासकीय मान्यता देतांना जर मूळ अंदाजानुसार वाढीव खर्च १५ टक्केपेक्षा जास्त असल्यास त्यास वित्त विभागाच्या मान्यतेची आवश्यकता आहे. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, पुणे यांनी प्रस्तावित प्रकल्पाचा वाढीव खर्च मूळ मान्यतेच्या तुलनेत सुमारे १५ टक्केपेक्षा जास्त असल्याने, सदर सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव वित्त विभागाच्या मान्यतेसाठी सादर केला असता त्यास वित्त विभागाने सहमती दर्शविली आहे. तसेच, व्यय अग्रक्रम समितीने दिनांक २०.८.२०१९ रोजी आयोजित बैठकीत मुंबई मध्यवर्ती कारागृहातील सर्कल क्र.१ (तळमजला + पहिला मजला) चे बांधकाम व विद्युतीकरणाच्या कामाकरीता रु.४४९.४० लक्ष इतक्या खर्चाच्या सुधारित अंदाजपत्रकास मान्यता दर्शविली आहे. त्यानुसार मुंबई मध्यवर्ती कारागृहातील सर्कल क्र.१ तळमजला + पहिला मजला चे बांधकाम व विद्युतीकरणाचे कामाकरीता रु.४४९.४० लक्ष इतक्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

मुंबई मध्यवर्ती कारागृहातील सर्कल क्र.१ (तळमजला + पहिला मजला) चे बांधकाम व विद्युतीकरणाचे काम पूर्ण करण्याकरिता रु.४४९.४१ लक्ष (अक्षरी चार कोटी एकोणपन्नास लाख एकेचाळीस हजार फक्त) इतक्या सुधारित अंदाजपत्रकास व खर्चास सदर शासन निर्णयान्वये सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर कामावर होणारा खर्च हा मागणी क्र. एच-८, ४०५९, सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, (४०५९०९१२) या लेखाशीर्षाखाली उपलब्ध होणा-या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला-

उपविभाग-५, अनुक्रमांक १, नियम १३४ अन्वये प्रशासनिक विभागांना प्रदान करण्यात आलेले अधिकार व सार्वजनिक बांधकाम विभाग अनौ.सं.क्र.२८५/१८/इमा २, दिनांक १.१२.२०१८ व वित्त विभाग, क्र. व्यअस २०१९/प्र.क्र.३७/अर्थ-२, दिनांक ३०.८.२०१९ अन्वये निर्गमित इतिवृत्त व दिनांक २०.८.२०१९ रोजी आयोजित व्यय अग्रक्रम समितीने दिलेल्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२००१२७१५५५२६०७२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Siddharth
Vidyadhar
Dhandore

Digitally signed by Siddharth Vidyadhar Dhandore
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=18c12c8352414c8a8937fd0998c9ca8d81b7ea489acfd971bb6de950e8d1d54f,
serialNumber=5d16166df09e111cba9c7d5e4e321b340111df7b21c5b0fff0be638e80ea9a1b, cn=Siddharth Vidyadhar Dhandore
Date: 2020.01.27 15:56:08 +05'30'

**( सि. वि. धांडोरे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
३. पोलीस महासंचालक (कारागृह), महाराष्ट्र राज्य,मुंबई,
४. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक,कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. कारागृह उप महानिरिक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. कारागृह उपमहानिरीक्षक पूर्व विभाग, नागपूर.
७. कारागृह उपमहानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे
८. कारागृह उपमहानिरीक्षक, मध्य विभाग, औरंगाबाद,
९. विशेष पोलीस महानिरिक्षक, दक्षिण विभाग, भायखळा, मुंबई,
१०.महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
११.महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
१२.जिल्हा कोषागार अधिकारी,मुंबई,
१३.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
१४.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२), मंत्रालय, मुंबई,
१५.कक्ष अधिकारी, (बियुडी-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई,
१६.निवडनस्ती तुरुंग २, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

***************